नाशिक जिल्ह्यातील मालेगाव
तालुक्यातील यंत्रमाग उद्योगांना
सा.प्रो.यो. २००१ अंतर्गत ड+ वर्गीकृत
तालुक्याप्रमाणे विशेष भांडवली अनुदान
देय करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,
शासन निर्णय क्र.यंत्रमाग-१००८/प्र.क्र.१८७/उद्योग-८,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक:-२७/१०/२००९.

वाचा:-१)शासन निर्णय सहकार, पणन वस्त्रोद्योग विभाग क्र.यंत्रमाग-१०२००३/प्र.क्र.१५२/
टेक्स-२, दि.११/२/२००४.

**प्रस्तावना:-**

राज्यातील यंत्रमागधारकांच्या समस्यांसंदर्भात सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या संदर्भाधीन दि.११/२/२००४ च्या शासन निर्णयाद्वारे जाहिर करण्यात आलेल्या यंत्रमाग पॅकेज योजनेमध्ये "औद्योगिक झोनसह रेसिडेंशियल व कमर्शिअल झोनमध्ये असणाऱ्या किंवा येणाऱ्या कॉमन शेड व व्यक्तीगत शेडमधील यंत्रमाग (जसे, साधे /सेमी /सेमी ऑटो /ऑटो/ जेकॉर्ड / टेरीटॉवेल/शटललेस या प्रकारचे यंत्रमाग धारक ) व गारमेंट उद्योगासाठी राज्यातील सर्व तालुक्यातील व्यवसायांना डी + हा औद्योगिक दर्जा उद्योग विभागाच्या वतीने देण्यात यावा व या व्यवसायाला डी + च्या सर्व सोयी सवलती या दि.१/४/२००१ पासून ज्यामध्ये नवीन औद्योगिक धोरण जाहिर झाल्याच्या तारखेपासून रेसिडेन्शियल व कमर्शियल झोनमध्ये असणाऱ्या या उद्योगासाठी सुध्दा सोयी सवलती देण्यात याव्यात अशी शिफारस क्र.५ करण्यात आली आहे. सध्याची यंत्रमाग उद्योगाची बिकट परिस्थिती व जागतिक आर्थिक मंदीची स्थिती विचारात घेऊन नाशिक जिल्ह्यातील मालेगाव तालुक्यातील यंत्रमाग उद्योगास मदत करण्याच्या हेतूने शासनाने खालील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या दि.११/२/२००४ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे जाहिर करण्यात आलेल्या यंत्रमाग पॅकेजमधील शिफारस क्र.५ अनुसार नाशिक जिल्ह्यातील मालेगाव तालुक्यात सा.प्रो.यो. २००१ अंतर्गत स्थापन झालेल्या व त्या योजनेनुसार पात्र ठरणाऱ्या यंत्रमाग घटकांना त्या योजनेनुसार ड+ वर्गीकृत तालुक्यातील घटकांना देय असलेले विशेष भांडवली अनुदान अनुज्ञेय करण्यात यावे.

२. या प्रयोजनासाठी होणारा खर्च सामुहीक प्रोत्साहन योजनेसाठी करण्यात येणा-या तरतुदीमधून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. हे आदेश सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग आणि वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६०२/०९/व्यय-१६,दि.२९/९/२००९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

४. हा शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २००९१०२७१५१९४०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( दा.अं.कुलकर्णी )
शासनाचे अवर सचिव

प्रति,

मा.मुख्यसचिव, मंत्रालय, मुंबई,
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा.वस्त्रोद्योग मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा.मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा.राज्यमंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा.राज्यमंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर,
अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई,
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र,नाशिक,
वित्त विभाग (व्यय-१६), मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती.